शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा वापर.

मंत्रालयीन विभागांची तपासणी भाषा संचालकांकडे सोपविण्याबाबत.

✓

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र. मभावा-१०९४/१३३५/प्र.क्र. ५८/९४/२०-ब,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८/१/९५.

पहा : १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मभावा-१०८४/प्र. २७१/२०, दि. २०-८-१९८४.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मभावा-१०८७/१०४७/प्र. १७२/८७/२०-ब, दि. २९ जुलै, १९८९.

निर्णय :

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ च्या तरतुदीनुसार दि. १ मे, १९६६ पासून वर्जित प्रयोजने वगळता, सर्व शासकीय कामकाज मराठीतून करणे बंधनकारक झाले आहे. तसेच, या आदेशांची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्यात यावी यासाठी शासनाने वेळोवेळी अनुदेशही दिले आहेत. तथापि, मराठी भाषेच्या वापरासंबंधात काही विभागांकडून योग्य ती दक्षता घेतली जात नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले व त्यासंदर्भात मुख्य सचिव यांनी दिनांक २३-१-९१ च्या टिप्पणीव्दारे असे आदेश सर्व सचिवांना दिले की, "सर्व प्रस्ताव [वर्जित प्रयोजने वगळून] मराठीतून सादर करण्यात येतील याची दक्षता घ्यावी. अन्यथा प्रकरण/प्रस्ताव परत करण्यात येतील व त्यामुळे होणाऱ्या विलंबाची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यावर राहील." तरीही काही मंत्रालयीन विभागांकडून टिप्पण्या व प्रारूपे वर्जित प्रयोजनात मोडत नसतानाही मराठीतून सादर केली जात नाहीत, असे दृष्टोत्पत्तीस आले आहे. तेव्हा उपरोक्त आदेशांचे पालन मंत्रालयीन विभागांकडून केले जाते किंवा कसे हे आवश्यक ते अभिलेख/नस्त्या तपासून जाणण्यासाठी आणि मंत्रालयीन विभागांच्या मराठीतून कामकाज करण्याविषयीच्या काही अडचणी असल्यास, त्या सोडविण्यासाठी, भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन याव्दारे प्राधिकृत करीत आहे. शासनाच्या सर्व सचिवांनी भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सदर तपासणी करण्यासाठी आवश्यक ते संपूर्ण सहकार्य करावे.

२. भाषा संचालक, मंत्रालयीन विभागांना पूर्वसूचना देऊन वेळोवेळी भेट देतील आणि शासकीय कामकाजात अधिकारी/कर्मचारी मराठीचा वापर करीत आहेत किंवा कसे याची खातरजमा करतील. तीन महिन्याचे कालावधीत एक मंत्रालयीन विभाग याप्रमाणे तपासणी करून मंत्रालयीन विभागवार तपासणी अहवाल भाषा संचालक आपल्या अभिप्रायासह सामान्य प्रशासन विभागाकडे पुढील कार्यवाहीसाठी सादर करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावानें.

सही/-

[व्ही. एस्. गोपालकृष्णन्]
अपर मुख्य सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति :

१] मुख्य सचिव यांचे उपसचिव,

२] सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

३] सर्व मंत्रालयीन विभागाचे आस्थापना सहसचिव/उपसचिव,

४] भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

५] निवड नस्ती.

सत्य प्रत

23.9.94

[अ. व. आंबेरकर]
सहसचिव,
महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.